**नागपूर प्रादेशिक विभागात अतिवृष्टीमुळे क्षतिग्रस्त पुलाची उच्चस्तरीय चौकशी करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्र. चौकशी-२०२०/प्र.क्र.२०५/ रस्ते- ४-अ**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :- ०४ सप्टेंबर, २०२०

**प्रस्तावना :-**

दिनांक २९ व ३० ऑगस्ट, २०२० रोजी नागपूर जिल्ह्यातील पारशिवनी तालुक्यातील पेंच नदीवर असलेल्या खैरी धरणामधून मोठ्या प्रमाणावर अचानक पाण्याचा विसर्ग सोडल्याने दिनांक ३० ऑगस्ट, २०२० रोजी पहाटेच्या दरम्यान पूलाच्या मध्यातील ८ गाळे कोलमडून पूल क्षतिग्रस्त झाल्याचे अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर यांनी कळविले आहे.

**शासन निर्णय :**

या अनुषंगाने नागपूर जिल्ह्यातील पारशिवनी तालुक्यातील माहुली-सालई-बिटोली प्रजिमा-१२६ वरील अतिवृष्टीमुळे मोठा पूल क्षतीग्रस्त झाला आहे. तसेच नागपूर प्रादेशिक विभागात इतर ठिकाणी सुध्दा पुलांची क्षती झाली आहे. या बाबीची चौकशी करण्याकरीता उच्चस्तरीय समिती गठीत करण्यात येत आहे. या समितीची रचना खालील प्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| (१) मुख्य अभियंता तथा सहसचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग मंत्रालय,मुंबई | :- | अध्यक्ष, |
| (२) अधीक्षक अभियंता, संकल्प चित्र (इमारती) | :- | सदस्य, |
| (३) अधीक्षक अभियंता, दक्षता व गुण नियंत्रण मंडळ,नागपूर | :- | सदस्य, |
| (४) अधीक्षक अभियंता, संकल्प चित्र (पूल) मंडळ, नवी मुंबई | :- | सदस्य सचिव. |

२. सदर चौकशी करीता समितीच्या कामकाजासाठी आवश्यक कागदपत्रे व आवश्यक माहिती संकलीत करून, अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ,नागपूर / चंदपूर / गडचिरोली यांनी समितीला उपलब्ध करुन द्यावी. तसेच नागपूर प्रादेशिक विभागातील इतर ठिकाणी अशा प्रकारे पूलांची क्षती झाली असल्यास, मुख्य अभियंता,नागपूर यांनी समितीला कळवावे व त्याची सुध्दा समितीने तपासणी करावी.

समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहिल.

(१) उपरोक्त पूलाच्या क्षतीग्रस्त होण्याचे सर्वसाधारण कारणमिमांसा सादर करणे,

(२) या प्रकारची हानी पुन:श्च टाळण्यासाठी उपाययोजना सुचविणे,

(३) संकलनाच्या पद्धतीमध्ये आवश्यक सुधारणा सुचविणे.

या समितीने आवश्यक अभ्यास करून आपला अहवाल शासनास दोन महिन्यांत सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००९०४१७३२५९४२१८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tanaji Shankar shelke

Digitally signed by Tanaji Shankar shelke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ff297c5a2378c5688902d6a48db66496180f7476fe69631418ba9d1a9a172e2e, cn=Tanaji Shankar shelke
Date: 2020.09.04 17:33:33 +05'30'

**( ता. शं. शेळके )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१. मा.राज्यपाल, यांचे प्रधान सचिव,राजभवन,मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, यांचे अप्पर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई.
३. मा.मंत्री,सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
४. मा.राज्यमंत्री,सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
५. अप्पर मुख्य सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे वरीष्ठ स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.
६. सचिव (रस्ते),सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.
७. सचिव (बांधकामे),सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.
८. मुख्य अभियंता तथा सहसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई यांना माहिती व योग्य कार्यवाहीस्तव.
९. मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशीक विभाग,नागपूर यांना माहिती व समितीला सर्व सहकार्य करण्याच्या सूचनेसह अग्रेषित.
१०. अधीक्षक अभियंता, संकल्प चित्र (इमारती) .
११. अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नागपूर.
१२. अधीक्षक अभियंता, संकल्प चित्र (पूल) मंडळ, नवी मुंबई.
१३. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर /चंद्रपूर / गडचिरोली.
१४. कार्यकारी अभियंता,कृषी बांधकाम विभाग,नागपूर.
१५. संग्रहार्थ-कार्यासन रस्ते-४अ.